कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उपअभियान अंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा - २४०१ A ४५९)
(राज्य हिस्सा - २४०१ A ४४१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ०७ मार्च,२०२२.

**वाचा :-**

१) वि. वि, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) कृषि विभागाची नस्ती क्र.कृयांयो-२०२२/प्र.क्र.२० (भाग-३)/कार्या-१४ अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उपअभियान यासाठी सन २०२१-२२ च्या तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.१०००.०० लाख व समरुप राज्य हिस्सा रु.६६७.०० लाख असा एकूण रु.१६६७.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत कृषी व पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन - कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उपअभियान याकरीता केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र व राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उप अभियान | २४०१ A ४५९ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | १६५०.०० | १०००.०० |
| | २४०१ A ४४१ राज्य हिस्सा (४० टक्के) | | १०००.०० | ६६७.०० |
| **एकूण** | | | **२६५०.००** | **१६६७.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१६६७.०० लाख (अक्षरी रुपये सोळा कोटी सदुसष्ट लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.११/व्यय-१४, दि.१८.०२.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१८२७४९४३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.08 12:34:19 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग

६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.